MPPO12

खर्चाच्या मंजूरी आदेशांमधील
त्रुटी दूर करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक:मुंविनि 1095/प्र.क्र.5/विनियम
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 31 मार्च 1995.

वाचावे:- (1) महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, 1965 मधील उपविभाग 25 आणि परिशिष्ट-6 मधील नियमातील तरतूद.

(2) अधिदान व लेखा कार्यालय यांचे पत्र क्रमांक अले/नियंत्रण/टिएमफा/34/(5)/161, दिनांक 31ऑगस्ट 1994.

(3) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक मुंविनि 1086/ प्र.क्र. 357/86/कोषा-6, दिनांक 19 ऑक्टोबर 1987.

परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, विविध मंत्रालयीन विभाग/विभाग प्रमुख/प्रादेशिक विभाग प्रमुख/ कार्यालयीन प्रमुख खर्चाच्या मंजूरी बाबतचे जे आदेश निर्गमित करतात ते अतिशय त्रोटक असून त्यात अत्यावश्यक अशा माहितीचा समावेश नसतो. परिणामी संबंधित महालेखापालांना/लेखा परीक्षण अधिका-यांना त्या आदेशाच्या संदर्भात आवश्यक ती माहिती मागविण्यासाठी मंजूरी देणा-या प्राधिका-याकडे परत संदर्भ करावा लागतो. अशा संदर्भांना संबंधित प्राधिकारी, महालेखापालांना/लेखा परीक्षण अधिका-यांना वेळेवर उत्तरे पाठवित नाहीत. त्यामुळे लेखा परीक्षणाच्या कामाला गती येत नाही. तसेच अशा मंजूरी आदेशातील त्रुटी, मंजूरी देणा-या प्राधिका-याच्या निदर्शनास आणूनदेखील त्याची तत्परतेने दखल घेतली जात नाही. खर्चाच्या मंजूरीचे आदेश काढणा-या प्राधिका-याने मंजूरी विषयीचे आदेश स्वयंपूर्ण, स्वयंस्पष्ट आणि परिपूर्ण असावेत यादृष्टीने दक्षता घ्यावी. याबाबत शासनाचे असे आदेश आहेत की, मंत्रालयाच्या प्रशासकीय विभागाने/विभाग प्रमुखाने/क्षेत्रीय विभाग प्रमुखाने/कार्यालय प्रमुखाने खर्चाच्या मंजूरीचे आदेश निर्गमित करताना खाली नमूद केलेल्या बाबींचे कटाक्षाने पालन करावे:-

(1) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका 1964/1978 व तद्नंतर वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या तत्संबंधीच्या सुधारित आदेशानुसार विविध स्तरांवरील अधिका-यांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तींचा अनुक्रमांक, तत्संबंधीचा नियम, नियम पुस्तिकेचा भाग, उप विभाग किंवा सुधारित शासन निर्णय क्रमांक व दिनांक आणि त्यासोबतच्या परिशिष्टातील शासन निर्णयाचा व संबंधित बाबींचा अनुक्रमांक या संबंधीचा अत्यंत स्पष्ट उल्लेख करावा.

(2) खर्चाच्या मंजूरीच्या आदेशात मालाच्या खरेदी/दुरुस्ती किंवा काम पूर्ण करण्यासंबंधी व इतर प्रकरणी विहित केलेल्या पध्दतीनुसार अधिकृत अभिकर्त्याकडून (एजन्ट) खरेदी करण्यात येणार आहे किंवा नाही, तसेच त्यासाठी दरपत्रके (कोटेशन) मागविण्यात येणार आहेत किंवा नाहीत, अधिकृत अभिकर्त्याकडून काम करून घेतले जाणार आहे किंवा नाही यासंबंधीचा स्पष्ट उल्लेख करावा.

(3) ज्या प्रकरणामध्ये सक्षम अधिका-यांना अधिकारी प्रदान केलेले असतात, परंतु आदेश दुय्यम अधिका-यांच्या सहीने निर्गमित होतात अशा प्रकरणामध्ये सक्षम अधिका-यांचे मान्यतेने आदेश निर्गमित केल्याचा उल्लेख करावा.

शामुमु-रोटा-विवि-एच-52(14,000+10-4-95)-1

(4) मंजूरी आदेश देयकाला जोडला जातो, तथापि त्याची प्रत कोषागार/अधिदान व लेखा कार्यालयास औपचारिकरित्या अग्रेषित केलेली नसते. तरी आदेशाची प्रत अधिदान व लेखा अधिका-यास आणि संबंधित कोषागार अधिका-यास अग्रेषित करण्यात यावी.

(5) मंत्रालयीन विभागांना असलेल्या वित्तीय शक्तींच्या मर्यादेबाहेरील रकमांच्या प्रस्तावांना वित्त विभागाच्या संमतीने मंजूरी दिलेली असेल तर सहमतीचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक व दिनांक विभागाने मंजूरी आदेशात नमूद करावा.

(6) मंजूरी आदेशात खर्चाचे लेखा शीर्ष पूर्णपणे नमूद करावे.

(7) निर्गमित करण्यात येणारे आदेश हे जास्तीत जास्त स्वयंस्पष्ट आणि स्वयंपूर्ण होतील/राहतील या दृष्टीने मंजूरीचे आदेश काढताना मंजूरी देणा-या प्राधिका-याने कटाक्षाने दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ.कृ. गोलतकर,
शासनाचे उप सचिव,
वित्त विभाग, मंत्रालय.

प्रति

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
संचालक, विमा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,

एच-52(14,000+10-4-95)-1अ

उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने/अधिकारी,
निवड फाईल, वित्त विभाग, विनियम.

* पत्राद्वारे